**वन विभागाच्या केंद्र शासन पुरस्कृत योजनेअंतर्गत फ्लेक्सी फंड वापरण्यास मंजुरी देण्याकरीता राज्यस्तरीय समितीचे गठण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१८/प्र.क्र.८८/फ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २६ डिसेंबर, २०१८

वाचा :- १) केंद्रीय वित्त मंत्रालय, व्यय विभाग, कार्यालयीन ज्ञापन क्र. F.No.55(5)/PF-II/2011, Dt.06.09.2016.

२) केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, वनसंरक्षण विभाग यांचे पत्र क्र.F.No.3-/2017-FPD(Pt), Dt.26.02.2018.

३) निती आयोग, भारत सरकार , कार्यालयीन ज्ञापन No. 12014/1/2015-E&F, Dt.13.07.2018.

४) केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, व्याघ्र प्रकल्प विभाग यांचे पत्र क्र.F.No.15-6/2014-PT, Vol.III, Dt.19.07.2018.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), म.रा., नागपूर यांचे पत्र क्र. Desk- WL/२२(६)/(Plan)/C.R.१०४/१९३९/१७-१८, Dt.२७.०८.२०१८

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/सी/प्र.क्र./१८-१९/०८४/२०१८-१९, दि.१९.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाने दि.०६.०९.२०१६ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनाद्वारे फ्लेक्सी फंड संदर्भात मार्गदर्शक सुचना निर्गमीत केल्या आहेत. यामध्ये केंद्रपुरस्कृत योजनांतर्गत प्राप्त होणारा निधीपैकी २५% निधी (केंद्र व राज्याचा हिस्सा मिळून) हा केंद्रपुरस्कृत असलेल्या योजनांच्या विशिष्ट उद्देश गाठण्यासाठी कोणत्याही उपयोजनेसाठी/ घटक/ नाविन्यपूर्ण बाबींवर खर्च करण्यासाठी फ्लेक्सी फंड म्हणून बाजूला काढून ठेवता येईल. अशा प्रकारची सवलत ज्या राज्यांना घ्यावयाची आहे त्यांना यासाठी राज्यस्तरीय मंजुरी समितीची मंजुरी घेणे आवश्यक आहे. प्रस्तुत दि.०६.०९.२०१६ रोजीच्या ज्ञापनामध्ये राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या धर्तीवर राज्यात राज्यस्तरीय समिती गठीत करण्याबाबतच्या मार्गदर्शक सुचना दिलेल्या आहेत. त्यानुसार वन विभागातील केंद्रपुरस्कृत योजनांसाठी फ्लेक्सी फंडांतर्गत

कार्यबाबींना मंजुरी प्रदान करण्याकरीता राज्यस्तरीय समितीचे (State level Sanctioning Committee-SLSC) गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**२.** केंद्रीय वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाने दि.०६.०९.२०१६ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनाद्वारे फ्लेक्सी फंड संदर्भात दिलेल्या मार्गदर्शक सुचना तसेच केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, वनसंरक्षण विभाग यांचे दि.२६.०२.२०१८ रोजीचे पत्र, निती आयोग, भारत सरकार यांचे दि.१३.०७.२०१८ रोजीचे कार्यालयीन ज्ञापन, केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, व्याघ्र प्रकल्प विभाग यांचे दि.१९.०७.२०१८ रोजीचे पत्र, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.२७.०८.२०१८ रोजीचे पत्र व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.१९.०९.२०१८ चे पत्र यासर्व पत्राद्वारे प्रस्तावित केल्यानूसार वन विभागाच्या केंद्रपुरस्कृत योजनांसाठी फ्लेक्सी फंडांतर्गत कार्यबाबींना मंजुरी प्रदान करण्याकरीता पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय समितीची गठन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | अध्यक्ष |
| २) | सचिव (वने), महसुल व वनविभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ४) | अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ५) | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, | सदस्य |
| ६) | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ७) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ८) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ९) | केंद्र शासनाच्या संबंधित केंद्र पुरस्कृत योजनांचे प्रतिननिधी | सदस्य |
| १०) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय) | सदस्य |
| ११) | सहसचिव (वने), महसूल व वनविभाग, | सदस्य सचिव |

**३.** वन विभागाच्या केंद्रशासन पुरस्कृत खालील योजनांचा समावेश फ्लेक्सी फंडांतर्गत असणार आहे.

१) वनवणवा प्रतिबंधन व व्यवस्थापन योजना (Forest Fire Prevention and Management Scheme)

२) वन्यजीवांच्या आश्रय स्थळांचा एकात्मीक विकास (Integrated Development of Wildlife Habitats)
३) हत्ती प्रकल्प (Project Elephant)
४) व्याघ्रप्रकल्प (Project Tiger)
५) हरित भारत अभियान (Green India Mission)
६) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (National Afforestation Programme)
७) नगर वन उद्यान (Nagar Van Udyan)

४. फ्लेक्सी फंडांतर्गत कार्यबाबींना मंजुरी प्रदान करतांना तसेच फ्लेक्सी फंडांतर्गत कार्यबाबींचे प्रस्ताव राज्यस्तरीय समितीकडे सादर करतांना केंद्रीय वित्त मंत्रालयाच्या व्यय विभागाने दि.०६.०९.२०१६ रोजी निर्गमीत केलेल्या कार्यालयीन ज्ञापनामधील सर्व मार्गदर्शक सुचनाचे, उद्दिष्टांचे व निधीचे वाटप व वापराशी संबंधित नमूद सर्व अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक राहील. प्रस्तुत ज्ञापनामध्ये नमूद केलेल्या मार्गदर्शक सुचना, उद्दिष्टे तसेच निधीच्या वाटप व वापराशी संबंधित अटी व शर्ती थोडक्यात पुढील प्रमाणे आहेत:-

<u>उद्दिष्टे:-</u>

- योजनेच्या एकूण उद्दिष्टांअंतर्गत उपविभागीय पातळीवर स्थानिक गरजा भागविण्याकरीता राज्यांना लवचिकता पुरविणे.
- योजनेच्या एकूण उद्दिष्टांअंतर्गत उपविभागीय पातळीवर कार्यक्षमता सुधारण्यासाठी नवकल्पना प्रायोगिकरित्या सुरु करणे.
- नैसर्गिक आपत्तीमध्ये आपत्ती कमी करण्यासाठी/ परिस्थिती पुन:स्थापित करणे किंवा अंतर्गत सुरक्षेत अडथळा निर्माण झाल्यामुळे परिणाम झालेल्या क्षेत्रामध्ये स्थानिक गरजा भागविणे.

<u>**निधी वाटप व मान्यता:-**</u>

- राज्य शासनाच्या इच्छेनूसार केंद्रपूरस्कृत योजनेसाठीच्या निधीपैकी (केंद्र व राज्याचा हिस्सा मिळून) २५ टक्के निधी मान्यता प्राप्त योजनेच्या उद्देशासाठी कोणत्याही उपयोजनेसाठी/घटक/नाविन्यपूर्णबाबींवर खर्च करण्यासाठी फ्लेक्सी फंड म्हणून बाजुला काढून ठेवता येईल.
- यासाठी राज्यस्तरीय मंजूरी समितीची मंजूरी घ्यावी लागेल.
- केंद्रपुरस्कृत योजनेचे नाव, संक्षिप्त नाव व बोधचिन्ह हे योजनेची मूळ वैशिष्ट्ये असल्यामुळे फ्लेक्सी फंडसाठी ती तशीच ठेवावी अन्यथा केंद्राचा हिस्सा बंद करण्यात येऊन सदर योजना राज्य योजना म्हणून अस्तित्वात राहील.

- मान्यताप्राप्त योजनेच्या कोणत्याही उप - योजनेसाठी किंवा योजनेच्या एखाद्या भागासाठी किंवा एखाद्या नाविन्यपूर्ण बाबींसाठी सदर निधी वापरता येईल.
- फ्लेक्सी फंडचा उद्देश राज्यांना योजनांच्या उपविभागीय पातळीवर स्थानिक गरजा भागविण्याकरीता निधी उपलब्ध होणे, एखाद्या योजनेमध्ये नाविन्यपूर्ण बाबीवर खर्च करुन योजनेचा उद्देश साध्य करण्यासाठी निधी उपलब्ध करणे तसेच राज्यात उद्भवलेल्या नैसर्गिक आपत्ती व अंतर्गत सुरक्षेत अडथळा निर्माण झाल्यास स्थानिक स्तरावर निधी उपलब्ध होण्यासाठी हे सर्व उद्देश आहेत.

**<u>फ्लेक्सी फंडचा वापर:-</u>**

- फ्लेक्सी फंड हा केंद्रीय पुरस्कृत असलेल्या योजनांच्या भागासाठी वापरावा. याचा विनियोग हा फक्त योजना, उपयोजना वा त्या योजनेचा एखादा भाग यासाठी व्हावा. एक छत्री अंमलाखाली असलेल्या संपूर्ण योजनेसाठीच फ्लेक्सी फंडचा वापर करु नये. उदा.प्राथमिक शिक्षणासाठी असलेल्या एखाद्या योजनेसाठी हा फंड वापरायचा असेल तर तो त्या योजनेच्या उपयोजनेसाठी वा एखाद्या भागासाठी फंडाचा वापर करता येईल. परंतू तो प्राथमिक शिक्षणाचा निधी उच्च शिक्षणासाठी वापरता येणार नाही. तथापी काही योजनांचा समावेश करुन सदर योजना एक छत्री अंमलाखाली आणून त्यांची कार्यक्षमता वाढवावयाची असेल व त्या प्रभावीपणे राबवावयाच्या असतील त्यावेळी फ्लेक्सी फंडचा वापर करता येईल. उदा. पोषणासंबंधिच्या योजनेचे उद्दिष्ट पुर्ण करावयाचे असेल तर त्यासाठी पुरक असलेल्या अंगणवाडी सेवांना, प्रसुतीविषयक बाबींसाठी तसेच आरोग्य विषयक बाबींसाठी हा निधी वापरता येईल.
- फ्लेक्सी फंड हा केंद्रपुरस्कृत योजनांसाठी आवश्यक त्या ठिकाणी नाविन्यपूर्ण बाबींसाठी व स्थानिक गरजा पूर्ण करण्यासाठी वापरावा. राज्यांच्या स्वत:च्या योजनांसाठी, तसेच बांधकाम/ कार्यालयाचे नुतनीकरण /वाहनांची खरेदी / कार्यालयीन फर्नीचर इत्यादी कामांसाठी वापरु नये.

**<u>नियंत्रण, मुल्यमापन व लेखापरिक्षण :-</u>**

- सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या इंटरनेटवरील MIS प्रणालीमध्ये फ्लेक्सीफंड्सचे नोंदणीकरण करण्याची प्रणाली तयार करावी ज्यामध्ये फ्लेक्सीफंड संदर्भात प्रतिमा/चित्रांच्या स्वरुपात अहवाल प्राप्त झाला पाहिजे. तसेच त्यामध्ये पारदर्शकता असली पाहिजे.

- सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या व मंत्रालयीन विभागाने, निती आयोगाने किंवा स्वतंत्र संस्थेने तयार केलेल्या मुल्यमापन प्रणालीमार्फतच फ्लेक्सी फंडचे मुल्यमापन करण्यात यावे.

- फ्लेक्सी फंडचे लेखापरिक्षण त्या त्या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत असलेल्या लेखापरिक्षणाअंतर्गत झाले पाहिजे. तसेच फ्लेक्सी फंडचे लेखापरिक्षण नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्यामार्फतही करण्यात यावे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२६१४५४४६७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.12.26 15:03:43 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

१) मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय,भारत सरकार.
३) सह सचिव,व्यय विभाग, वित्त मंत्रालय,भारत सरकार.
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (वने), महसुल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), म.रा.,नागपूर.
१०) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) महाराष्ट्र राज्य,नागपूर.
११) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय), मंत्रालय, मुंबई.
१२) वरिष्ठ संशोधन अधिकारी,निती आयोग, भारत सरकार, नवी दिल्ली.
१३) उप महानिरीक्षक, वने (वन संरक्षण विभाग), पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार.

१४) उप महानिरीक्षक (व्याघ्र प्रकल्प विभाग), पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, भारत सरकार.

१५) सर्व सह सचिव (वने),महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) विशेष कार्य अधिकारी (फ-१), महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.

१७) अवर सचिव (फ-३,फ-१०, फ-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८) कक्ष अधिकारी ( फ-५, फ-६, फ-९), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.